राज्य माहिती आयोग, खंडपीठ छत्रपती संभाजीनगर या कार्यालयात प्रतिनियुक्तीने कार्यरत असलेल्या श्री. सुनिल हाके, लिपिक टंकलेखक यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि २०२४/प्र.क्र.११२ /प्रशा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २९ ऑगस्ट, २०२४

**वाचा :**
१) या विभागाचे आदेश क्र. एएससी १५१७/प्र.क्र.१३७/१४-अ, दि. २८-०८-२०१८.
२) या विभागाचे आदेश क्र. एएससी १५१७/प्र.क्र.१३७/१४-अ, दि. ०९-०९-२०२०.
३) या विभागाचे आदेश क्र. एएससी १५१७/प्र.क्र.१३७ (भाग-३)/१४-अ, दि. १५-०९-२०२२.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. रामाआ २०१७/प्र.क्र.१०/सहा, दि. २१-०६-२०२३.
५) या विभागाचे आदेश क्र. एएससी १५२३/प्र.क्र.८४ /१४-अ, दि. २८.०७.२०२३.
६) सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन -६ यांचा दि.१७.०५.२०२४ रोजीचा प्रस्ताव.

**शासन आदेश**

संदर्भाधीन क्र. १ येथील दिनांक २८-०८-२०१८ रोजीच्या आदेशान्वये श्री. सु.शे.हाके, लिपिक-टंकलेखक, जलसंपदा विभाग यांची राज्य माहिती आयोग, खंडपीठ छत्रपती संभाजीनगर या कार्यालयात २ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती. श्री. हाके हे दि. ११-०९-२०१८ रोजी राज्य माहिती आयोग, खंडपीठ छत्रपती संभाजीनगर येथे रूजू झाले. तद्नंतर या विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ येथील दि. ०९-०९-२०२० च्या आदेशान्वये श्री. हाके यांच्या प्रतिनियुक्तीस २ वर्षाची (दि. ११-०९-२०२० ते दि. १०-०९-२०२२) तर संदर्भाधीन क्र. ३ येथील दि. १५-०९-२०२२ च्या आदेशान्वये १ वर्षाची (दि. ११-०९-२०२२ ते दि. १०-०९-२०२३ पर्यंत) मुदतवाढ देण्यात आलेली होती. श्री. हाके यांच्या ५ वर्षाच्या प्रतिनियुक्तीचा कालावधी (मुदतवाढीसह) दि. १०-०९-२०२३ रोजी संपुष्टात आला आहे.

२. संदर्भाधिन क्र. ४ येथील दि. २१-०६-२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य माहिती आयोग कार्यालयातील पदांचा सुधारीत आकृतीबंध तयार केला आहे. सदर आकृतीबंधानुसार महाराष्ट्र राज्य माहिती आयोगाच्या आस्थापनेवरील लिपिक-टंकलेखकांची नियमित पदे निरसित झाली असून, सदर पदे आता बाह्ययंत्रणेव्दारे भरण्यात येणार असल्याने संदर्भाधीन क्र.५ येथील दि.२८.०७.२०२३ रोजीच्या आदेशान्वये श्री. हाके यांच्या सेवा प्रत्यावर्तीत करण्यात आल्या होत्या तथापि, राज्य माहिती आयोग, खंडपीठ छत्रपती संभाजीनगर या कार्यालयाने श्री. हाके यांना कार्यमुक्त केलेले नाही.

३. संदर्भाधीन क्र.६ येथील प्रस्तावान्वये सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-६ यांनी प्रशासकीय कारणास्तव श्री.हाके यांच्या राज्य माहिती आयोग, खंडपीठ छत्रपती संभाजीनगर या कार्यालयातील प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे.

४. या ओदशान्वये राज्य माहिती आयोग, खंडपीठ छत्रपती संभाजीनगर या कार्यालयातील सहायक कक्ष अधिकारी या संवर्गातील रिक्त पदे विचारात घेवून प्रशासकीय निकड म्हणून सहायक कक्ष अधिकारी संवर्गातील पद लिपिक-टंकलेखक संवर्गात श्रेणी अवनत करुन सदर पदावर श्री. सुनिल हाके, लिपिक-टंकलेखक यांच्या प्रतिनियुक्तीस एक विशेष बाब म्हणून १ वर्षासाठी (दि.११-०९-२०२३ ते दि. १०.०९.२०२४ पर्यंत) मुदतवाढ देण्यात येत आहे.

५. सदर मुदतवाढ ही अंतिम स्वरुपाची असून, त्यांना यापुढे कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही. तसेच त्यांना मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव पुन्हा राज्य माहिती आयोग, खंडपीठ छत्रपती संभाजीनगर यांनी या विभागाकडे सादर करु नये. श्री. हाके यांच्या मुदतवाढीचा कालावधी समाप्त होताच त्यांच्या सेवा त्यांच्या मूळ विभागास प्रत्यावर्तीत करण्यात याव्यात.

६. राज्य माहिती आयोग, खंडपीठ छत्रपती संभाजीनगर या कार्यालयातील सहायक कक्ष अधिकारी हे पद लिपिक-टंकलेखक या संवर्गात अवनत करण्याची कार्यवाही कार्यासन-६ यांनी करावी.

७. प्रतिनियुक्ती संदर्भातील सर्व अटी व शर्ती संदर्भाधीन क्र. १ च्या शासन आदेशात नमूद केल्याप्रमाणे असतील.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२९१७४७०४१००७ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2024.08.29 18:03:02 +05'30'

**( ग. स. परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. सु.शे.हाके लिपिक-टंकलेखक, (**राज्य माहिती आयोग, खंडपीठ छत्रपती संभाजीनगर कार्यालयामार्फत**)

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. राज्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, खंडपीठ छत्रपती संभाजीनगर, छत्रपती संभाजीनगर.
३. सह/उप सचिव (आस्थापना), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. उप सचिव (का.६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. उपसचिव, राज्य माहिती आयोग, खंडपीठ छत्रपती संभाजीनगर, छत्रपती संभाजीनगर.
६. सा.प्र.वि./प्रशा-३ (संग्रहार्थ)